**ग्रामीण भागातील घरांची नोंदणी पती-पत्नी यांच्या संयुक्त नावे करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक-व्हीपीएम २६०३/प्र.क्र.२०६८/पंरा-४**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- २० नोव्हेंबर, २००३**

## परिपत्रक

महिलांमध्ये सुरक्षिततेची भावना निर्माण होण्यासाठी त्यांना पतीच्या मालमत्तेमध्ये हक्क देणे ही मुलभूत गरज आहे. भारतीय संस्कृतीमध्ये पती-पत्नी यांना एकरूप -एक घटक मानला जातो व प्राप्त संपत्ती दोघांची असल्याचे मानले जाते. त्यामुळे स्त्रियांचा आत्मसन्मान वाढविण्यासाठी त्यांच्या असलेल्या घराची नोंद पती -पत्नी दोघांच्या नावे असणे आवश्यक आहे. ब-याचवेळा पतीच्या निधनानंतर पतीच्या मालमत्तेमध्ये हक्क प्रस्थापित करताना महिलांना अनेक कायदेशीर अडचणींना सामोरे जावे लागते. जर आधीच पती-पत्नीचे नाव महसूली दप्तरात असेल तर अशा अडचणी येणार नाहीत. त्यासाठी सुरुवात म्हणून पती आणि पत्नीच्या संयुक्त नावे ग्रामीण भागातील घरांची नोंदणी करणे आवश्यक आहे. त्यासाठी सर्व ग्रामपंचायतींना पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

महाराष्ट्र कर व फी नियम, १९६० चे भाग-२ मध्ये कर आकारणी संदर्भात कार्यपध्दती विहित केलेली आहे. सदर कार्यपध्दतीशी अनुसरुन महाराष्ट्रातील सर्व जिल्ह्यातील ग्रामपंचायतींनी यापुढे ग्रामीण भागातील घरांच्या नोंदी फॉर्म-८ मध्ये पती व पत्नी यांच्या संयुक्त नावाने कराव्यात. त्यासाठी प्रस्तुत नियमाच्या भाग-२ मध्ये विहित केलेल्या कार्यपध्दतीप्रमाणे सूचना व हरकती मागवून ग्रामपंचायतीचा ठराव घेऊन सदर

नोंदी पती व पत्नी यांच्या संयुक्त नावाने करण्याबाबत तत्काळ कार्यवाही करावी. सदर कार्यवाही तात्काळ पूर्ण करून त्याबाबतचे प्रमाणपत्र सर्व ग्रामपंचायतीतील प्रत्येक घरी कोणत्याही परिस्थितीमध्ये डिसेंबर, २००३ अखेर पर्यंत देण्याची व्यवस्था करावी.

२. या आदेशाची तात्काळ अंमलबजावणी आवश्यक आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( कुंदा गोस्वामी )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :-

१) सचिव, महिला व बालकल्याण विभाग.

२) सर्व विभागीय आयुक्त.

३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

४) निवड नस्ती, कार्या.क्र.पंरा-४.